**शासकीय मागासवर्गीय (आदिवासी) वसतिगृहातील विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सुविधांमध्ये सुसूत्रता आणणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-१३८४/३६३२७/का.१२
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ११ जुलै, १९८५.

**वाचा :-** (१) शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य,क्रिडा व पर्यटन विभाग क्रमांक बीसीएच-१०८२/९०३८५ (३८)/का.३२, दिनांक १६ मे, १९८४ व समक्रमांकित शासन निर्णय, दिनांक २४ ऑगस्ट, १९८४

(२) संचालक, आदिवासी विकास महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्रमांक सआवि व गृह-नियम-८४८५-का.२-४५९०, दिनांक ११ डिसेंबर, १९८४

**शासन निर्णय :-** आदिवासी विकास विभागामार्फत आदिवासींकरिता सध्या एकूण २८ वसतिगृहे राज्यात चालविली जातात. या शिवाय १९८५-८६ या आर्थिक वर्षापासून समाजकल्याण खात्याकडून आदिवासी लोकसंख्या जास्त प्रमाणात असणाऱ्या भागात यापूर्वी चालविली जाणारी एकूण ७४ शासकीय मागसवर्गीय वसतिगृहे आदिवासी विकास विभागाकडे वर्ग करण्यात आली आहेत. प्रस्तावनेतील अनक्रमांक एक येथील शासन निर्णयान्वये समाजकल्याण विभागाच्या कार्यकक्षेत असणाऱ्या शासकीय मागासवर्गीय वसतिगृहातील विद्यार्थ्यांना दिल्या जाणाऱ्या सुविधांमध्ये सुसूत्रता आणण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्याच धर्तीवर आदिवासी विकास विभागाकडून चालविल्या जाणाऱ्या वसतिगृहाबाबत अशा प्रकारची नियमावली तयार करण्याची बाब काही काळ शासनाच्या विचाराधिन होती. यावर आता पूर्ण विचार झाला असून, शासन खालील आदेश देत आहे :-

२. अ) सध्या अस्तित्वात असलेली विद्यार्थ्यांसाठी प्रवेश नियमावली रद्द करुन त्या ऐवजी परिशिष्ट "अ" मध्ये देण्यात आलेली नवीन नियमावली अमलात आणावी.

ब) शासकीय वसतिगृहातून ज्या ठिकाणी सध्या ठेकेदारी पध्दत चालू आहे, ती बंद करावी वा विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता देण्यात यावा किंवा कसे याबाबत संचालक, आदिवासी विकास यांनी योग्य तो निर्णय घ्यावयाचा आहे.

१) इतर ठिकाणी परिशिष्ट "ड" मध्ये दिल्यानुसार नवीन आहार प्रमाणानुसार भोजन देण्यात यावे.

२) विभागीय स्तरावरील वसतिगृहांना ठेकेदारी पध्दत चालू रहावी असे विद्यार्थ्यांना वाटत असल्यास त्या वसतिगृहातील विद्यार्थ्यांनी आपले लेखी निवेदन गृहप्रमुख/गृहपाल यांच्याकडे सादर करावे. गृहप्रमुख/गृहपाल यांनी वसतिगृहातील बहुतांशी विद्यार्थ्यांना ही पध्दत चालू करावी असे मत

प्रदर्शित केल्याची खात्री करुन खालील अटीवर विद्यार्थी प्रतिनिधींच्या सहाय्याने वसतिगृहांत भोजन व्यवस्था चालू करावी.

अटी :- १) ठेकेदार पध्दतीसाठी मागवावयाच्या निविदा गृहपाल मागवितील.

२) प्राप्त झालेल्या निविदांची विद्यार्थ्यांचे निवडलेले तीन प्रतिनिधी संचालकांनी निर्देश दिलेले उपसंचालक या वर्ग-१ चे अधिकारी आणि गृहपाल यांचे संयुक्त बैठकीत तपासणी करुन योग्य निविदा स्वीकारली जाईल.

३) सदर पध्दतीवर होणारा सर्व खर्च विद्यार्थ्यांना मिळणाऱ्या निर्वाह भत्त्यातून वसूल केला जाईल.

४) विद्यार्थ्यांना/विद्यार्थीनींना देण्यात येणाऱ्या सुविधा सर्व स्तरावरील वसतिगृहातून परिशिष्ट "ब" "क" "ड" "ई" प्रमाणे दर्शविल्यानुसार पुरविण्यात येतील.

५) आश्रमशाळेतील इ.७ वी पास झालेल्या आदिवासी मुला-मुलींसाठी नव्याने सुरु केलेल्या शासकीय वसतिगृहातील आदिवासी मुला-मुलींचे प्रवेशाची नियमावली परिशिष्ट "अ-१" मध्ये दिलेली आहे.

६) विभागीय स्तरावरील वसतिगृहातील विद्यार्थ्यांना/विद्यार्थीनींना देण्यात येणारा निर्वाह भत्ता खालीलप्रमाणे ठरविण्यात आला आहे.

| | |
|---|---|
| अ) भोजन, दूध व न्याहारी | रु.२२५/- (दरमहा दर विद्यार्थ्याला) |
| ब) शाळा व कॉलेजमध्ये जाणा येण्याकरिता लागणारा वाहन खर्च/अंगाचा व कपड्याचा साबण केशकर्तन व तेल याकरिता. | रु.२५/- (दरमहा दर विद्यार्थ्याला) |
| क) अन्यत्र बाबी व पूरक खर्च | रु.५०/- (दरमहा दर विद्यार्थ्याला) |

७) विभागीय स्तरावरील विद्यार्थी/विद्यार्थीनींना देण्यात येणारा "निर्वाह भत्ता" खालील अटींवर देण्यात यावा.

अ) वसतिगृहानजीकच्या स्टेट बँक अगर राष्ट्रीयकृत बँकेत खाते उघडलेले असावे.

ब) शाळा कॉलेजमध्ये मागील महिन्यातील ८०% उपस्थिती असल्याबाबतचा संस्था प्रमुखांचा दाखला विद्यार्थ्यांना दरमहा १५ तारखेपर्यंत वसतिगृह प्रमुखास सादर करावा. अभ्यासक्रम सुरु झाल्यापासूनचा पहिल्या दोन महिन्याचा दाखला देणे जरुरीचे नाही. मात्र तिसऱ्या महिन्यात मागील उपस्थितीचा दाखला सादर करणे आवश्यक आहे.

क) ज्या महिन्यांचा "भोजन भत्ता" देय आहे त्याच्या मागील महिन्याची महाविद्यालयातील उपस्थिती विचारात घेण्यात यावी. ज्या विद्यार्थ्यांची उपस्थिती ८०% किंवा जास्त असेल त्याला पूर्ण भोजन भत्ता देण्यात यावा. ज्याची उपस्थिती ८०% पेक्षा कमी आहे त्याला उपस्थितीच्या प्रमाणात भत्ता देण्यात यावा. उदा.विद्यार्थ्यांची उपस्थिती ७५% असेल तर त्याला फक्त ३/४ भोजन भत्ता देण्यात येईल. विद्यार्थी आजारपणास्तव गैरहजर असेल तर वसतिगृह प्रमुखास तसे प्रमाणपत्र देण्यासाठी त्याचा भोजन भत्ता देताना व्यवस्था करावी.

ड) शिक्षण संस्था प्रमुखांनी प्रमाणपत्राबरोबरच विद्यार्थी/विद्यार्थीनी यांच्या प्रगती व वर्तन याबाबतचा देखील उल्लेख करावा. वसतिगृह प्रमुखांनी विद्यार्थ्यांच्या त्यांच्या पालकांना लेखी सूचना द्याव्यात व त्यानंतरही प्रगती न आढळल्यास त्यांना दाखल्यानुसार वर्तन व प्रगती असमाधानकारक

आढळल्यास वसतिगृहातून कमी करण्याबाबतचा अहवाल संबंधित उपसंचालक वा आदिवासी विकास अधिकारी ज्यांना याबाबतीत संचालकांनी अधिकार दिलेले आहेत त्यांचेकडे सादर करावा.

इ) शाळा, महाविद्यालये व इतर शैक्षणिक संस्थांना १० किंवा अधिक दिवासांची सुट्टी जाहीर करण्यात येते, तेव्हा विद्यार्थ्यांना सुट्टी जाहीर झालेल्या तारखेनंतर जास्तीत जास्त तीन दिवस वसतिगृहात राहता येईल. त्यानंतर सुट्टीच्या काळाचा त्यांना निर्वाह भत्ता देता येणार नाही.

फ) भारत सरकार मागासवर्गीय शिष्यवृत्ती पात्र असणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांचे/विद्यार्थीनीचे अर्ज वसतिगृह प्रमुखांनी भरुन द्यावेत व ते संबंधित संस्थांकडे पाठविण्यात यावे. सदर मंजूर झालेल्या शिष्यवृत्तीतून शैक्षणिक संस्थांनी त्यांना देय असणारे सर्व शैक्षणिक शुल्क कापून घेऊन निर्वाह भत्त्यापोटी विद्यार्थ्यांना देय असणारी रक्कम शासकीय कोषागारात चलनाव्दारे जमा करावी व वसतिगृह प्रमुखास त्याप्रमाणे कळवावे. सदर शैक्षणिक संस्था प्रमुख ही बाब पूर्ण करीत आहेत. याबाबतची खात्री करुन घेण्याची संपूर्ण जबाबदारी वसतिगृह प्रमुखाची राहील. निर्वाह भत्त्यापोटी देय असणारी रक्कम दर महिन्याच्या २५ तारखेच्या आत वसतिगृह प्रमुखांनी कोषागारात कॉन्टीजंट बीलावर (एम.टी.आर.नंबर ३१) काढावे. सदर रकमेचा धनादेश महिन्याच्या शेवटच्या तारखेस प्रत्येक विद्यार्थ्यांच्या खात्यात जमा होईल अशाप्रकारे कार्यवाही करावी.

३. यावर होणारा खर्च संबंधित वसतिगृहाचा खर्च ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकला जातो त्याखाली दाखविण्यात यवा व त्या त्या व्यय शिर्षाखाली १९८५-८६ सालात उपलब्ध असणाऱ्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज. ल. पिंपळे )
उप सचिव,
महाराष्ट्र शासन.

## परिशिष्ट - "अ"- १
## शासकीय मागासवर्गीय मुलामुलींचे वसतिगृह प्रवेशाची नियमावली

१) प्रत्येक शासकीय वसतिगृहात त्या त्या वर्षी उपलब्ध असलेल्या रिक्त जागांपैकी पाच टक्के जागा "विशेष बाब" म्हणून शासनातर्फे भरण्यात येतील. प्रत्येक वर्षी उपलब्ध असलेल्या रिक्त जागांपैकी ५ टक्के जागांची माहिती आदिवासी विकास अधिकारी यांनी वसतिगृहनिहाय संचालक, आदिवासी विकास यांना १५ जुलैपूर्वी कळविली पाहिजे. कोणत्याही परिस्थितीत शासनाचे आदेश होईपर्यंत त्या जागा भरता येणार नाही.

२) शासकीय वसतिगृहात रिक्त असलेल्या वरील ५ टक्के जागाशिवाय इतर जागांसाठी प्रवेश देण्याचे अधिकार आदिवासी उपयोजना क्षेत्रातील वसतिगृहांसाठी प्रकल्प अधिकारी (आदिवासी विकास) आणि आदिवासी विकास अधिकारी यांना राहतील. त्यांनी दिलेले प्रवेश नियमानुसार आहेत याची खात्री करुन घेण्याची जबाबदारी उपसंचालक, आदिवासी विकास, सह्याद्री विभाग, उपसंचालक, गोंडवन विभाग यांचेवर राहिल. वसतिगृहातील नियमांचे बाबतीत शंका वा वाद झाल्यास संचालक, आदिवासी विकास यांचा निर्णय अंतीम राहील. आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील व विभागीय स्तरावरील वसतिगृहात प्रवेश देणेसाठी उपसंचालक, आदिवासी विकास, आदिवासी विकास अधिकारी, वसतिगृहाचे गटप्रमुख वा गृहपाल या तिघांच्या समितीने हे काम करावे.

३) राज्यातील कोणत्याही भागातील विद्यार्थी/विद्यार्थीनींना कोणत्याही शासकीय वसतिगृहांत प्रवेश दिला जाईल.

४) आदिवासी विकास विभागाव्दारे चालविण्यात येणाऱ्या शासकीय मागासवर्गीय मुला/ मुलींच्या वसतिगृहांमध्ये नव्याने प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या मागासवर्गीय विद्यार्थी/विद्यार्थीनींनी प्रवेश अर्ज छापील आवेदन पत्रामध्ये (सोबतच्या नमुन्याप्रमाणे) संबंधित वसतिगृहाचे गृहप्रमुख/ गृहपालाकडे खाली नमूद केलेल्या तारखेच्या आत पाठवावयाचे आहे.

| | |
|---|---|
| १) माध्यमिक शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थी/विद्यार्थीनी | १५ मे पूर्वी |
| २) महाविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थी-विद्यार्थीनींसाठी | २० जून पूर्वी अगर निकाल लागल्यापासून १५ दिवसांचे आत. |

उपरिनिर्दीष्ट दिनांकानंतर आलेले प्रवेश अर्ज कोणत्याही सबबीवर स्विकारले जाणार नाहीत. तसेच अपूर्ण महिती असलेले अर्ज देखील विचारात घेतले जाणार नाही. तारखेत बदल करण्याचे अधिकार संचालक, आदिवासी विकास यांना देण्यात येत आहे.

५) वसतिगृहात प्रवेश मिळालेल्या विद्यार्थ्यांना शाळा/महाविद्यालय सुरु होण्यापूर्वीच्या अगोदरच्या दोन दिवसापासून त्यांची वार्षिक परिक्षा पूर्ण झाल्यानंतरच्या तीन दिवसापर्यंत वसतिगृहात राहता येईल. वार्षिक परिक्षा संपल्यानंतर व पुढील शैक्षणिक वर्ष सुरु होण्याच्या काळात जर कोणत्याही

५) विद्यार्थ्यांत शैक्षणिक संस्थेच्या प्रमुखाच्या शिफारशीनुसार वसतिगृहात रहाणे आवश्यक असेल तर उपसंचालक वा आदिवासी विकास अधिकारी यांच्या लेखी परवानगीने वसतिगृहात रहाता येईल. परंतु या काळात त्यांना स्वतःच्या खर्चाने रहावे लागेल.

६) खालील अटी पूर्ण करणारे विद्यार्थी/विद्यार्थीनी वसतिगृहात प्रवेशास पात्र असतील.

अ) जे महाराष्ट्र राज्यातील अधिकृत वा मुळचे रहिवाशी आहेत.

ब) जे अनुसूचित जाती/जमाती, विमुक्त जाती व भटक्या निम-भटक्या जमातीपैकी व आर्थिकदृष्ट्या मागासलेले आहेत.

७) अ) खालील विद्यार्थी/विद्यार्थीनींना प्रवेशपात्र धरण्यात येणार नाही.

१) विभागीय स्तरावरील वसतिगृहात शालेय अभ्यासक्रम करीत असणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रवेश देता येणार नाही.

२) महाविद्यालयीन शिक्षण क्रमाच्या मध्यंतरीच्या वर्गात (इंटरमिजीस्ट स्टेज) शिकत असलेल्या विद्यार्थी/विद्यार्थीनींना, तथापि नियमानुसार जुन्या व नवीन विद्यार्थ्यांना प्रवेश दिल्यानंतरही ज्या जाती-जमातींच्या रिक्त जागा राहतील त्या रिक्त जागांवर त्या त्या जमातीचे मध्यंतरीचे वर्गात प्रवेश घेतलेले (इंटरमिजीस्ट स्टेज) नवीन विद्यार्थी उपलब्ध असतील तर त्यांनाही प्रवेश देण्यात यावा.

३) जर ते कोणत्याही नोकरीत असतील तर.

४) जर ते अर्धवेळ (पार्ट टाईम) अभ्यासक्रम करीत असतील तर.

५) जर ते तांत्रिक वा वैद्यकीय विभागातील परीक्षा सोडून अन्य परिक्षेस नापास झाले असतील तर अगर कोणत्याही कारणास्तव परिक्षेस बसले नसतील तर.

६) वैद्यकीय शाखेच्या व अभियांत्रिकी शाखेच्या विद्यार्थ्यांना संपूर्ण शैक्षणिक कालावधीत दोन विद्यापिठाच्या परिक्षेस नापास झाले तरी शिक्षण चालू ठेवता येईल. मात्र तिसऱ्यांदा नापास झाल्यास वसतिगृहात राहण्यास अपात्र समजले जाईल.

७) जर ते माध्यमिक शाळेत आठव्या वर्गात खालील वर्गात शिक्षण घेत असतील तर.

**अपवाद**

१) अनुसूचित क्षेत्रातील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थी/विद्यार्थीनीचे बाबतीत जर ते माध्यमिक शाळेतील पाचवी व पुढील वर्गात असतील तरीही त्यांना प्रवेश देण्यात येईल. मात्र त्यात पहिली पसंत कातकरी, वारली, कोलाम व माडीया गोंड यांना दिले जाईल. तसेच भाग भंगी या जातीच्या विद्यार्थ्यांना खास सवलत म्हणून त्यांना वेगळा विचार होऊन प्रत्येक प्रकरणी स्वतंत्र निर्णय घेण्यात येईल.

७) जुन्या विद्यार्थी/विद्यार्थीनींना पुन्हा पुढील वर्षी प्रवेश देतेवेळी त्यांच्या मागील वर्षाच्या वसतिगृहातून वागणूकीबाबत वाईटशेरा असेल तर प्रवेश दिला जाणार नाही.

८) जुने विद्यार्थी/विद्यार्थीनींना मागील वार्षिक परीक्षेपेक्षा चालू वार्षिक परीक्षत पास होताना शेकडा ५% कमी गुण मिळाले तर प्रवेश दिला जाणार नाही.

९) प्रवेशार्थी विद्यार्थ्यांचे/विद्यार्थीनींचे पालक स्थानिक असल्यास वसतिगृहात प्रवेश मिळणार नाही.

१०) ज्या विद्यार्थी/विद्यार्थीनींना प्रवेश अर्जामध्ये दिलेली माहिती खोटी आढळल्यास त्यांचा प्रवेश रद्द करण्यात येईल.

११) ज्या विद्यार्थी/विद्यार्थीनींच्या पालकाचे मासिक उत्पन्न रु.१०००/- (रुपये एक हजार) पेक्षा जास्त आहे.

८) विद्यार्थी/विद्यार्थीनींची निवड सर्वस्वी त्यांच्या गुणवत्तेनुसार व त्यांचेसाठी असलेल्या राखीव जागांच्या प्रमाणात केली जाईल.

९) ज्या विद्यार्थ्यांना/विद्यार्थीनींना वार्षिक परीक्षत अे.टी.के.टी.ने पुढील वर्गात प्रवेश दिला असेल अशा विद्यार्थ्यांचा वसतिगृहातील प्रवेश चालू ठेवावा. मात्र वरील नियम ८ प्रमाणे सदर विद्यार्थी प्रवेशासाठी पात्र ठरला पाहिजे.

१०) प्रत्येक वसतिगृहात असलेल्या जागांची विभागणी खालीलप्रमाणे करण्यात यावी.

जिल्हा व तालुका स्तरावरील वसतिगृहे

| | |
|---|---|
| अ) महाविद्यालयीन व उच्च माध्यमिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी | ७०% |
| ब) माध्यमिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी | ३०% |

विभागीय स्तरावरील वसतिगृहे

| | |
|---|---|
| अ) कनिष्ठ महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी | २०% |
| ब) उच्च महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी | ८०% |

**टीप :-**

वसतिगृहे असलेले शहरात वेगवेगळे वैद्यकीय अभ्यासक्रम व अभियांत्रिकी पदवी पदवीकाचे परीक्षांचे अभ्यासक्रम आहेत. अशा ठिकाणच्या वसतिगृहात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या वरील शाळांच्या प्रथम वर्षासाठी सर्व पात्र (Eligible) विद्यार्थ्यांना त्यांच्या जाती/जमातीनुसार ठरविलेल्या टक्केवारीपैकी उपलब्ध जागेनुसार प्रथम प्रवेश देण्यात येईल. नंतर इतर महाविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा विचार होईल. प्रवेश बंद झाले नंतर वैद्यकीय अभियांत्रिकी वा तांत्रिकी विषयातील पदविका मिळवू पाहणारे विद्यार्थी प्रवेशासाठी आले तर त्यांचे साठीच फक्त तेवढ्या जागा वाढवून त्यांना प्रवेश देण्यात यावा.

**स्थानिक विद्यार्थी :-**

स्थानिक विद्यार्थी म्हणजे वसतिगृह असलेल्या शहराच्या (महानगर पालिका, नगर पालिका वा गावाची हद्द) हद्दीत पालकांच्या घरी राहून अभ्यासक्रम पुरा करु शकणारा विद्यार्थी असे समजावे.

११) प्रत्येक वसतिगृहात मागासवर्गीय व आर्थिक दृष्ट्या मागासवर्गीय विद्यार्थी/विद्यार्थीनींना खालील टक्केवारीनुसार प्रवेश दिला जाईल.

अ) प्रत्येक वसतिगृहात क्षमतेनुसार असलेल्या जागांपैकी फक्त १० टक्के जागा आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या विद्यार्थी/विद्यार्थीनींसाठी राहतील.

ब) उरलेल्या जागा सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" च्या सहपत्रात जिल्हावार दर्शविल्यानुसार भरण्यात येतील.

क) मात्र विभागीय वसतिगृहे सोडून इतर वसतिगृहात आणखीन १० टक्के जागा दारिद्र्यरेषेखालील कौटुंबिक कार्ड धारण करणाऱ्या व्यक्तिंच्या मुला-मुलींसाठी राखून ठेवण्यात येतील.

१२) विभागीय स्तरावर सर्व वसतिगृहाचे प्रवेश अर्ज संबंधित उपसंचालक वा आदिवासी विकास अधिकारी यांनी ठरवून दिलेल्या ठिकाणी मागविण्यात यावे. प्रवेशार्थींना त्याची आगाऊ सूचना देण्यात येईल.

१३) विभागीय स्तरावरील सर्व वसतिगृहांसाठी मुलांची अर्जाप्रमाणे वसतिगृहावर गुणवत्ता यादी तयार करण्यात येईल.

१४) उपरिनिर्दिष्ट नियमात कोणत्याही प्रकारचे शिथिलता अथवा सुट देण्याचे सर्व अधिकार संचालक, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे स्वाधिन असून त्यांचा याबाबतचा निर्णय अंतिम राहील.

## परिशिष्ट "अ" चे सहपत्र

राहिलेल्या ८५ वा ७५ टक्के जागा खालील दर्शविलेल्या टक्केवारीनुसार भरण्यात याव्यात. विभागीय स्तरावरील अनुक्रमे मुंबई,पुणे,नाशिक (मुले), औरंगाबाद,नागपूर, अमरावती येथील ९ वसतिगृहांमध्ये खालील टक्केवारीनुसार विद्यार्थ्यांना प्रवेश द्यावा.

(१) अनुसूचित जमातीचे विद्यार्थी/विद्यार्थीनी ५० टक्के
(२) अनुसूचित जातीचे विद्यार्थी/विद्यार्थीनी ३५ टक्के
(३) विमुक्त जाती व भटक्या जमाती विद्यार्थी/विद्यार्थीनी १५ टक्के

(ब) (२) इतर सर्व मागासवर्गीय वसतिगृहात विद्यार्थ्यांचे प्रमाण खालील टक्केवारीनुसार होईल.

| अ.क्र. | जिल्हा | अनुसूचित जमाती | अनुसूचित जाती | विमुक्त जाती व भटक्या जमाती |
|---|---|---|---|---|
| १ | धुळे | ८५ टक्के | १० टक्के | ५ टक्के |
| २ | ठाणे | ८५ टक्के | १० टक्के | ५ टक्के |
| ३ | रायगड | ८५ टक्के | १० टक्के | ५ टक्के |
| ४ | गडचिरोली | ८५ टक्के | १० टक्के | ५ टक्के |
| ५ | अहमदनगर | ८५ टक्के | १० टक्के | ५ टक्के |
| ६ | नाशिक | ७५ टक्के | २० टक्के | ५ टक्के |
| ७ | पुणे | ७५ टक्के | १५ टक्के | १० टक्के |
| ८ | अमरावती | ७५ टक्के | २० टक्के | ५ टक्के |
| ९ | नांदेड | ७० टक्के | १५ टक्के | १५ टक्के |
| १० | यवतमाळ | ७० टक्के | १५ टक्के | १५ टक्के |
| ११ | वर्धा | ७० टक्के | १५ टक्के | १५ टक्के |
| १२ | नागपूर | ७० टक्के | १५ टक्के | १५ टक्के |
| १३ | भंडारा | ७० टक्के | २० टक्के | १० टक्के |
| १४ | चंद्रपूर | ७० टक्के | २० टक्के | १० टक्के |
| १५ | जळगांव | ५० टक्के | ४५ टक्के | ५ टक्के |

**टिप :-** वरील टक्केवारीनुसार प्रवेश देतेवेळी खालील अटी आणखी कटाकक्षाने पाळण्यात याव्यात.

अ) अनुसूचित जाती/जमाती यापैकी कोणत्याही एका जाती/जमातीच्या विद्यार्थ्यांना/विद्यार्थीनींना जिल्हा स्तरावरील एका वसतिगृहात ३० टक्क्यापेक्षा जास्त जागा देऊ नये. त्याच्यात बदल करावयाचा झाल्यास संचालक, आदिवासी विकास यांची आगाऊ परवानगी घेणेत यावी.

ब)	अनुसूचित जातीच्या जागांच्या टक्केवारीपैकी मांग व भंगी जातीच्या विद्यार्थ्यांसाठी/विद्यार्थीनींसाठी जिल्हा स्तरावरील वसतिगृहात खालीलप्रमाणे जागा राखून ठेवण्यात याव्यात.

| | |
|---|---|
| महानगरपालिका हद्दीत व<br>"अ" वर्ग नगरपालिका हद्दीत | १४ टक्के<br>(मांग ७ टक्के, भंगी ७ टक्के) |

क)	नगरपालिका या तालुकास्तरावरील वसतिगृह	१० टक्के (मांग ५ टक्के, भंगी ५ टक्के)ड) वर दर्शविलेल्या निर्धारीत टक्केवारीनुसार विद्यार्थी/विद्यार्थीनींचे पुरेसे अर्ज उपलब्ध झाले नसल्यास सदर जाती-जमातीच्या राखीव जागा संचालकांच्या पूर्व परवानगीने खालील दर्शविलेल्या जाती जमातीच्या उपलब्ध प्रतिक्षा यादीतून भरण्यात याव्यात.

| | | |
|---|---|---|
| प्रथम प्राधान्य | - नसल्यास - | अनुसूचित जमाती |
| व्दीतीय प्राधान्य | - नसल्यास - | मांग व भंगी |
| तृतीय प्रधान्य | - नसल्यास - | भटक्या व विमुक्त जाती |
| चतुर्थ प्राधान्य | - नसल्यास - | अनुसूचित जाती |

इ)	संचालकांची पूर्व परवानगी घेण्यासाठी निर्धारीत टक्केवारीत बदल करुन जागा भरण्यासाठी याबाबतीत करण्यात आलेल्या प्रयत्नांचा अहवाल सादर करणे आवश्यक आहे.

फ)	संचालकांच्या पूर्व परवानगीनुसार अन्य गटातील जाती जमातींच्या विद्यार्थी/विद्यार्थीनींना जागा दिल्यानंतर त्या विद्यार्थी/विद्यार्थीनीस दिलेला प्रवेश पुढील वर्षी सदर विद्यार्थी/विद्यार्थीस ज्या गटात मोडत असेल त्या गटातील जागा दिली गेली आहे असे समजण्यात येईल. जेणेकरुन मूळ राखीव जागा त्या त्या गटासाठी प्रवेशासाठी खुली राहील.

*************************

# <u>परिशिष्ट "ब"</u>
## <u>शैक्षणिक साहित्य</u>
## <u>पुस्तके</u>

अ) १) इयत्ता १२ वी पर्यंतच्या विद्यार्थ्यांना फक्त क्रमिक पुस्तकेच खालील अटींवर पुरविण्यात यावीत.

(१.१) रु.१५ पर्यंतची क्रमिक पुस्तके जास्त काळ टिकणारी नसल्यामुळे वर्षअखेर परत घेवू नयेत.

(१.२) रु.१५ पेक्षा जास्त किंमतीची पुस्तके वर्ष अखेरीस वसतिगृह प्रमुखाकडे परत करण्यात यावीत.

(१.३) रु.५० पेक्षा जास्त किंमतीची पुस्तके प्रत्येक तीन विद्यार्थ्यांच्या गटास एक प्रत याप्रमाणेच खरेदी करुन ती संस्थेच्या वाचनालयात ठेवण्यात यावीत व विद्यार्थ्यांना गरजेनुसार पुरविण्यात यावीत.

(२) इयत्ता १२ वी च्या पुढील विद्यार्थ्यांना :-

(२.१) रु.१५ पर्यंतची क्रमिक पुस्तके जास्त काळ टिकणारी नसल्यामुळे वर्ष अखेरी परत घेऊ नयेत.

(२.२) रु.१५ पेक्षा अधिक परंतु रु.५० पर्यंत किंमतीची क्रमिक पुस्तके प्रत्येक विद्यार्थ्यास पुरविण्यात यावीत व ही पुस्तके वर्ष अखेरीस वसतिगृह प्रमुखाकडे परत करण्यात यावीत.

(२.३) रु.५० पेक्षा अधिक किंमतीची क्रमिक पुस्तके/संदर्भ पुस्तके शैक्षणिक संस्थेच्या प्रमुखांच्या शिफारशीनुसार खरेदी करण्यात यावीत. अशी पुस्तके प्रत्येक ३ विद्यार्थ्यांच्या गटासाठी एक प्रत या प्रमाणेच खरेदी करावीत व ती संस्थेच्या वाचनालयात ठेवावीत. विद्यार्थ्यांना गरजेनुसार ती पुरवण्यिात यावीत.

**टिप :-**

कोणतीही पुस्तके खरेदी करण्यापूर्वी संस्थेत शिल्लक असलेल्या सदर पुस्तकांचा साठा विचारात घेऊनच नवीन खरेदी करण्यात यावीत. वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे याबाबत मागणी करताना शिल्लक असलेल्या साठयाबाबत उल्लेख करणे आवश्यक आहे. याबाबत पुस्तके शिल्लक असताना ती खरेदी केलीत असे आढळल्यास शासकीय पैशाचा अपव्यय केल्याबाबत संस्था प्रमुखास जबाबदार धरले जाईल.

ब) <u>वह्या व स्टेशनरी</u> :-

वह्या, कोरे कागद, प्रात्यक्षिक वह्या, रजिस्टर्स, कंपास बॉक्स, कलर बॉक्स इत्यादी साहित्य परिशिष्ट "ड" दाखविल्याप्रमाणे देण्यात यावे. साहित्य विद्यार्थ्यांना गरजेनुसार व शिक्षण संस्था प्रमुखांच्या शिफारशीनुसार द्यावे. हे साहित्य वर्ष पूर्ण झाल्यानंतर परत घेवू नये. हे वरील रु.५० व त्याखालील किंमतीचे साहित्य सतत वापरल्यामुळे निरुपयोगी होते म्हणून परत घेण्यात येवू नये.

क) <u>इतर साहित्य</u> :-

१) वैद्यकीय शाखेसाठी संपूर्ण अभ्यासक्रमाच्या कालात इतर साहित्य उदा.स्टेथॉस्कोप वगैरेसाठी जास्तीत जास्त खर्च रुपये शंभरापेक्षा अधिक करता येणार नाही.

२) अभियांत्रिकी पदवी आणि पदविका यांच्या संपूर्ण अभ्यासक्रमाच्या काळात इतर साहित्या उदा.ड्रॉईंग बोर्ड वगैरेसाठी जास्तीत जास्त खर्च रु.१०००/- पेक्षा जास्त करता येणार नाही. इतर साहित्यापैकी कोणतीही वैयक्तिक बाब रु.१५०/- पेक्षा जास्त किंमतीची नसावी.

३) कलानिकेतन या शाखेतील पदविका अगर पदवीचा अभ्यासक्रम घेणारे जे चित्रकला पेंटींग किंवा तत्सम अभ्यासक्रम पूर्ण करीत असतील अशा विद्यार्थ्यांसाठी प्रती वर्षी त्या त्या अभ्यासक्रमासाठी लागणारे इतर साहित्य उदा. रंग,ब्रश,कॅनव्हास बोर्ड वगैरेसाठी जास्तीत जास्त खर्च रु.२५००/- पेक्षा अधिक करता येणार नाही. इतर साहित्यापैकी कोणतीही वैयक्तिक बाब रु.१५०/- पेक्षा जास्त किंमतीची नसावी.

वरील तिन्ही प्रकारातील इतर साहित्याखाली पुरविण्यात आलेल्या रु.१००/- किंवा जास्त किंमतीच्या वस्तु विद्यार्थ्याने शैक्षणिक सत्राच्या अखेर वसतिगृह प्रमुखास परत कराव्यात.

ड) <u>गणवेष</u> :-

१) शालेय शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थी/विद्यार्थीनींसाठी संपूर्ण वर्षाकरिता गणवेषाचे प्रत्येकी दोन संच प्राचार्याच्य शिफारशीनुसार (एकूण रु.१००/- पर्यंत दोन्हीकरिता)

२) ॲप्रन (पांढरा कोट) वैद्यकीय अभ्यासक्रमाचे विद्यार्थ्यासाठी प्रत्येकी दोन एकूण रु.१००/- पर्यंत दोन्हीकरिता (दीड वर्षाकरिता)

३) बॉयलर सूट अभियांत्रिकी शाखेतील विद्यार्थ्यांसाठी गडद निळया रंगाचा अभ्यासक्रमाचे सुरुवातीला फक्त एकदाच एक सुट जास्तीत जास्त रु.८०/- पर्यंत कॉलेज भांडारातून घ्यावा.

४) लॅब्रोटरी ॲप्रन :- जास्तीत जास्त रु.२५/- पर्यंत विज्ञान विभागाचे रसायनशास्त्राचे विद्यार्थ्यांसाठी संपूर्ण अभ्यासक्रमाकरिता प्रत्येकी एक कॉलेज भांडारातून घ्यावा.

५) ज्या महाविद्यालयातून शारिरीक शिक्षण सक्तीचे असेल त्या ठिकाणी महाविद्यालयाने ठरवून दिलेला गणवेष कॅनव्हास बूट व पायमोजसहीत एक संच रु.७५/- पर्यंत देण्यात यावा.

टीप :- वरील साहित्य परत घेवू नये.

इ) <u>संकीर्ण</u> :-

१) <u>शैक्षणिक सहली</u>

अभियांत्रिकी, भूगर्भशास्त्र, वनस्पतीशास्त्र व भूगोल या अभ्यासक्रमासाठी शैक्षणिक सहली सक्तीच्या असल्यास त्याकरिता प्रत्येक विद्यार्थ्यावर एका वर्षात जास्तीत जास्त रु.२००/- पेक्षा अधिक खर्च करता येणार नाही.

रिपोर्टस :-

२) अभियांत्रिकी व समाजसेवा अभ्यासक्रमानुसार प्रोजेक्ट रिपोर्ट वा थेसीस आवश्यक असल्यास यासाठी शैक्षणिक संस्थेच्या प्रमुखांच्या शिफारशींनुसार जास्तीत जास्त रु.१५०/- पेक्षा अधिक खर्च करता येणार नाही.

क्रिडा व्यवस्था

ई) प्रत्येक वसतिगृहात शक्यतो स्वत:चे क्रिडांगण असावे, असल्यास तेथे सिंगलबार, डबलबार, व्हॉलीबॉल, चेस, रिंग व कॅरमबोर्ड इत्यादी खेळाचे साहित्य शक्यतो उपलब्ध करुन द्यावे. यासाठी दरवर्षी वसतिगृहास जास्तीत जास्त रु.२००/- पर्यंत खर्च करता येईल.

वैद्यकीय सुविधा

फ) विद्यार्थ्यांची वैद्यकीय तपासणी वर्षातून एकदा जनरल हॉस्पिटल मधून करुन द्यावी. प्रत्येक वसतिगृहात प्रथमोपचाराची पेटी असावी. आजारी विद्यार्थ्यांवर त्वरीत वैद्यकीय उपचार करावेत. सदर उपचार जनरल हॉस्पिटलमध्ये केला जावा. जनरल हॉस्पिटलमध्ये औषधे उपलब्ध नसलयास बाहेरुन औषधे घ्यावयाचे असल्यास वसतिगृह प्रमुखास २० रुपयापर्यंत औषधे खरेदी करता येतील. त्यापेक्षा जास्त खर्चाची औषधे समाजकल्याण अधिकारी वर्ग-१ यांच्या पूर्वपरवानगीशिवाय खरेदी करता येणार नाहीत.

**************************

## परिशिष्ट "क"

वह्या स्टेशनरी :-

१. अ) इयत्ता १० वी साठी संपूर्ण वर्ष भराकरिता ४२०० पेजेस

ब) बाकी अभ्यासक्रमासाठी संपूर्ण वर्षाकरिता ३२०० पेजेस

क) महाविद्यालयाचे विद्यार्थ्यांना रजिस्टर्स,कागद वगैरे त्यांचे विभागाने प्रमाणित केले असल्यास त्याप्रमाणे.

ड) प्रात्यक्षिक वह्या, विद्यालय/महाविद्यालयाने प्रमाणिक केल्याप्रमाणे.

इ) कंपास बॉक्स एक अभ्यासक्रमाचे सुरुवातीस फक्त एकदा.

फ) कलर बॉक्स एक अभ्यासक्रमाचे सुरुवातीस एकदा.

२. वह्या व स्टेशनरीसाठी तांत्रिक, अभियांत्रिकी,वैद्यकीय वगैरे अभ्यासक्रमासाठी त्याचे विभाग प्रमुखाने प्रमाणित केलेल्या यादीप्रमाणे देण्यात यावे. सदर यादी वसतिगृह प्रमुखाने संबंधित संस्था प्रमुखाकडून मिळवावी. आदिवासी कल्याण अधिकारी त्याबाबत पूर्ण चौकशी करुन निर्णय देतील.

घ) प्रत्येक वसतिगृहामध्ये विद्यार्थ्यांच्या प्रमाणात प्रत्येकी ५० विद्यार्थ्यांच्या एका गटासाठी एक वर्तमानपत्र व दोन मासिके पुरविण्यात यावीत. त्यावर होणारा जास्तीत जास्त खर्च दरमहा रु.३०/- एका गटासाठी असावा.

ह) शिकवणी :-

आठवी, नववी, दहावीच्या वर्गात शिकत असणाऱ्या विद्यार्थ्यांना गणित, इंग्रजी व शास्त्र या विषयात सहामाही परिक्षेत ४० टक्क्यापेक्षा कमी गुण प्राप्त झाले असल्यास फक्त त्या त्या विषयासाठी शिकवणी लादण्यात यावी. यासाठी प्रत्येक विद्यार्थ्यामागे प्रत्येक विषय दररोज एक तास शिकविण्यासाठी दरमहा रु.१०/- पर्यंत खर्च करण्याची परवानगी असावी.

कोणत्याही शाखेतील विद्यार्थ्यास दिलेले व परत घेण्याचे साहित्य व पुस्तके वर्षाअखेरीस परत घेण्यात यावीत. विद्यार्थी साहित्य व पुस्तके परत न देता गेल्यास त्याबाबत त्यांच्या परिक्षेचा निकाल रोखून ठेवण्याबाबत महाविद्यालय, विद्यालय व विद्यापीठ यांना त्वरीत कळविण्यात यावे. याची लेखी समज पालकांना देखील देण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत अशा विद्यार्थ्यास पुढील वर्षी प्रवेश देण्यात येवू नये.

***************************

# परिशिष्ट "ड"

**आहाराचे प्रमाण**

विभागीय स्तराव्यतिरिक्त इतर ठिकाणच्या शासकीय वसतिगृहातून शासनामार्फत भोजन व्यवस्था अंमलात आणण्यात यावी. विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या भोजनामध्ये येणाऱ्या वेगवेगळ्या घटक पदार्थांचे प्रतीदिवशी (दोन्ही वेळच्या जेवणाचे) द्यावयाचे जास्तीत जास्त प्रमाण खालीलप्रमाणे असावे.

२. भोजनासाठी खालील पदार्थांशिवाय इतर कोणतेही पदार्थ अगर विशेष अनुदान देता येणार नाही.

| अ.क्र. | वस्तुचे नांव | मुलांकरिता आकडे ग्रॅममध्ये | मुलींकरिता आकडे ग्रॅममध्ये |
|---|---|---|---|
| १ | गहू,ज्वारी वा बाजरी | ४०० | ३०० |
| २ | तांदूळ | १०० | १०० |
| ३ | कडधान्य/डाळी | १३० | १३० |
| ४ | पालेभाज्या/फळभाज्या/कंदभाज्या | ३०० | २५० |
| ५ | साखर (शिऱ्यासाठी/रोजच्यासाठी) | २० | २० |
| ६ | गोडतेल | २० | ३० |
| ७ | वनस्पती तूप (शिऱ्यासाठी) | १५ | १५ |
| ८ | दूध | २०० मि.ली. | २०० मि.ली. |
| ९ | मटण,मासे किंवा अंडी (महिन्यातून एकदा) | १२५ग्रॅम किंवा २ अंडी | १२५ग्रॅम किंवा २ अंडी |
| १० | शेगदाणे | १५ | १५ |
| ११ | रवा (महिन्यातून एकदा) | ६०<br>(शाकाहारासाठी मासांहरा ऐवजी) | ६० |
| १२ | मसाला | ४० | ४० |
| १३ | मीठ | २० | ३० |
| १४ | इंधन | ८०० | ८०० |

*************************

## परिशिष्ट "ई"

आवश्यक साहित्याची यादी

ज्या वसतिगृहाला स्वतःची इमारत आहे व जेथे प्रत्येक विद्यार्थ्यामागे ४० चौरस फूट जागा उपलब्ध आहे अशा वसतिगृहातून विद्यार्थ्यांना खालील प्रमाणात जरुरीनुसार साहित्य उपलब्ध करुवून द्यावे. इतर ठिकाणी जागेच्या उपलब्धतेनुसार अतिआवश्यक वस्तुच फक्त पुरविण्यात याव्यात.

| अ.क्र. | वस्तुचे नांव | आकार | नग | कालमर्यादा |
|---|---|---|---|---|
| १ | फर्निचर | | | |
| | अ) लोखंडी पलंग | ६ x २.५ | एक | १० वर्षे |
| | ब) खुर्ची लोखंडी हात नसलेली | सर्वसाधारण आकाराची | एक | १० वर्षे |
| | क) लाकडी टेबल कपाटासहित | ३ x २ | एक | १० वर्षे |
| २ | बिछाना साहित्य | | | |
| | अ) सतरंजी | ६ x २.५ | एक | ५ वर्षे |
| | ब) गादी (७ किलो रुईची) | ६ x २.५ | एक | ५ वर्षे |
| | क) लोकरी ब्लँकेट | ५४ x ९० | एक | ५ वर्षे |
| | ड ) उशी (दिड किलो रुईची) | १४ x १२ | एक | २ वर्षे |
| | इ) चार (बेडशीट) | ५४ x ९० | तीन | २ वर्षे एक पांघरणे व एक अंथरणे व एक भांडारात ठेवणे |
| | फ) उशीचा अभ्रा | १५ x १३ | दोन | २ वर्षे विद्यार्थ्याला एक द्यावा व एक भांडारात ठेवावा. |
| ३ | भांडी | | | |
| | अ) स्टीलचे कप्याचे ताट २०-२२ गेजचे (विभगीय स्तर सोडून) | १४" | एक | १५ वर्षे |
| | ब) स्टील पेला | ६" | एक | १५ वर्षे |
| | क) लोखंडी बादली | १६" | दोन | ३ वर्षे (एका खोलील) |
| ४ | इतर साहित्य | | | |
| | अ) प्लास्टिक मग | ६" | एक | १ वर्षे एका खोलीत |
| | ब) कचऱ्याची टोपली | १२" | एक | १ वर्षे |
| | क) पिण्याचे पाण्यासाठी माठ (प्रत्येक पाच मुला/मुलींसाठी) | मध्यम आकाराचा | एक | १ वर्षे |
| | ड) आरसा (प्रत्येक पाच मुला/मुलींसाठी) | १२" x १८" | एक | १० वर्षे |
| | इ) लोखंडी तिपाई (प्रत्येक पाच मुला/मुलींसाठी) | | एक | १० वर्षे |
| | फ) वसतिगृहासाठी मोठे घड्याळ | | एक | -- |